**शासनाने वितरीत केलेल्या अनुदानापैकी अखर्चित निधी खर्च करण्याबाबतची कार्यप्रणाली.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकिर्ण-१०.१५/प्र.क्र.१८/अर्थोपाय**
मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक:- २५ ऑगस्ट,२०१५.

<u>वाचा</u>:- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक संकिर्ण १०.०२/प्र.क्र.१२८/अर्थोपाय, दि.२६ सप्टेंबर,२००५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक संकिर्ण १०.०२/प्र.क्र.१२८/अर्थोपाय, दि.३१ ऑगस्ट, २००७..
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक संकिर्ण १०.०२/प्र.क्र.१२८/अर्थोपाय, दि.१५ नोव्हेंबर, २००७.
४) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक संकिर्ण १०.०२/प्र.क्र.१२८/अर्थोपाय, दि.६ जून,२००८.

<u>प्रस्तावना:-</u>

उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णयान्वये शासनाने जिल्हा परिषदा, नगर परिषदा, महानगरपालिका तसेच शासनाकडून विविध महामंडळांना/प्राधिकरणांना वितरीत केलेल्या निधीपैकी वर्ष अखेर अखर्चित राहिलेला निधी खर्च करण्याची कार्यप्रणाली विषद केली आहे. महापालिका, नगरपरिषदा व जिल्हापरिषदा यांना वितरित केलेला निधी त्या आर्थिक वर्षानंतरच्या पुढील एका वर्षात खर्च करण्याची मुभा आहे. त्यानंतर शासनाची मान्यता आवश्यक आहे. अशा अखर्चित निधीबाबत विभागाकडून आढावा होऊन व अखर्चित निधी खर्च करण्याची परवानगी देत असताना प्रत्यक्ष निधीची उपलब्धता, प्रत्यक्ष काम झाले आहे किंवा कसे व त्याच कामावर एकाहून अधिक स्त्रोतातून निधी खर्च होत नाही या बाबींची तपासणी आवश्यक असते. या सर्व बाबी विचारात घेऊन व ही पध्दत अधिक सुटसुटीत व्हावी यासाठी पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

दि. ३१.०३.२०१४ पर्यंतच्या अखर्चित निधीसंदर्भात खालीलप्रमाणे निदेश देण्यात येत आहेत:-

अ) प्रशासकीय विभागांनी अशा अखर्चित निधी संदर्भात तात्काळ आढावा घ्यावा. सदर आढावा दि.३०.०९.२०१५ पर्यंत पूर्ण करण्यात यावा.

ब) बांधकामाव्यतिरिक्त (वेतन, अनुदान व सवलती, इत्यादी) अखर्चित निधी तात्काळ शासनास जमा करण्यात यावा.

क) बांधकामाच्या निधीसंदर्भात खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी:-

(i) जी कामे भौतिकदृष्टया पूर्ण झाली आहेत व खर्चाच्या परवानगी अभावी देयकाचे प्रदान होऊ शकत नाही, अशा सर्व प्रकरणी खर्चाची परवानगी विभाग स्तरावर देण्यात यावी. परवानगी देत असताना त्याच कामावर इतर स्त्रोतातून खर्च न झाल्याची खात्री विभागाने करावी.

(ii) जी कामे सुरू होऊन भौतिकदृष्टया अपूर्ण आहेत, ती कामे पुढील दि.३१.०३.२०१६ पर्यंत पूर्ण होतील असे विभागाकडून नियोजन केले जाईल या अटींच्या अधीन राहून दि. ३१.०३.२०१६ पर्यंत खर्च करण्याची परवानगी विभागस्तरावर देण्यात यावी.

(iii) जी कामे अद्याप सुरू नाहीत त्याचा निधी तात्काळ शासन जमा करावा.

ड) प्रशासकीय विभागांनी यापुढे अनुदान मुक्त करत असताना विहीत मुदतीत (म्हणजेच पुढील वर्षाच्या दि.३१ मार्च पर्यंत) खर्च होईल तेवढेच अनुदान वितरित करण्याची दक्षता घ्यावी.

२. दि.३१.०३.२०१४ पर्यंत अखर्चित राहिलेला निधी खर्च करण्यास मान्यता मिळण्यासाठीच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने उपरोक्त प्रमाणे कार्यवाही करावी व दि.३१.०३.२०१४ नंतर मुक्त केलेल्या निधीच्या संदर्भात पुर्वीचे आदेश लागू राहतील व असा निधी विहीत मुदतीत खर्च करण्याची पूर्ण जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२५१७१६३२५८०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant Krishna Patil

Digitally signed by Vasant Krishna Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Krishna Patil
Date: 2015.08.25 17:41:26 +05'30'

(व.कृ.पाटील)
शासनाचे उप सचिव, वित्त विभाग

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग)
२) सर्व उप सचिव, अवर सचिव, वित्त विभाग / सर्व व्यय कार्यासने, वित्त विभाग
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
४) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परिक्षा), मुंबई
५) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
६) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परिक्षा), नागपूर
७) संचालक, लेखा व कोषागारे
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई /वांद्रे
९) निवासी लेखा अधिकारी,मुंबई.
१०) निवड नस्ती (अर्थोपाय)